**महाराष्ट्र राज्य नाविन्यपूर्ण स्टार्टअप धोरण या योजनेंतर्गत निधी वितरीत करण्याबाबत. (सन २०२३-२४ मागणी क्रमांक झेडए-२, लेखाशिर्ष २२३० ए ३३४)**

**महाराष्ट्र शासन**
**कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : कौविउ-२०२३/प्र.क्र.१०१/कौशल्य-२**
२ रा मजला, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १२ जुलै, २०२३

वाचा : १. शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२२/प्र.क्र.४०/अर्थ-३, दिनांक १२ एप्रिल, २०२३
२. महाराष्ट्र राज्य नाविन्यता सोसायटी, मुंबई यांचे दिनांक ०३ जुलै,२०२३ रोजीचे पत्र.

**प्रस्तावना :**

महाराष्ट्र राज्य नाविन्यपूर्ण स्टार्टअप धोरण या योजनेंतर्गत सन २०२२-२३ या आर्थिक वर्षामध्ये, रु.४४.५३ कोटी (अक्षरी रुपये चव्वेचाळीस कोटी त्रेपन्न लाख फक्त) इतक्या निधीच्या १० टक्के वितरीत व खर्च करण्यास संदर्भाधीन क्र. १ परिपत्रकान्वये मान्यता देण्यात आलेली आहे. महाराष्ट्र राज्य नाविन्यता सोसायटी, मुंबई यांनी संदर्भाधीन पत्र क्र.२ अन्वये, महाराष्ट्र राज्य नाविन्यपूर्ण स्टार्टअप धोरण या योजनेंतर्गत, सन २०२३-२४ या आर्थिक वर्षामध्ये, लेखाशिर्ष मागणी क्र. झेडए-२ (२२३० ए३३४) अंतर्गत अर्थसंकल्पीय तरतूदीमधील निधी उपलब्ध करून देण्याबाबतची विनंती शासनास केली आहे. त्यानुसार महाराष्ट्र राज्य नाविन्यपूर्ण स्टार्टअप धोरणा अंतर्गत विविध उपक्रम राबविण्यासाठी सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरीता लेखाशिर्ष मागणी क्र. झेडए-२ ( २२३० ए३३४ ) अंतर्गत अर्थसंकल्पीय तरतूदीपैकी रू.४.४५ कोटी ( अक्षरी रुपये चार कोटी पंचेचाळीस लाख फक्त ) इतका निधी वितरीत करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

महाराष्ट्र राज्य नाविन्यपूर्ण स्टार्टअप धोरणाची अंमलबजावणीकरिता महाराष्ट्र राज्य नाविन्यता सोसायटीकडून राबविण्यात येत असलेल्या विविध उपक्रमाकरीता सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरीता लेखाशिर्ष मागणी क्र. झेडए-२ ( २२३० ए३३४ ) अंतर्गत पुढीलप्रमाणे निधी वितरीत करण्यात येत आहे.

(रु.कोटीमध्ये)

| लेखाशिर्ष | अर्थसंकल्पीय तरतूद | यापूर्वी वितरीत करण्यात आलेला निधी | या शासन निर्णयाद्वारे वितरीत निधी | एकूण वितरीत निधी |
|---|---|---|---|---|
| महाराष्ट्र नाविण्यपूर्ण स्टार्टअप धोरण,लेखाशिर्ष २२३० ए३३४, ३१-सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) | ४४ .५३ | ००.०० | ४.४५ | ४.४५ |

२. सदरहू खर्च मागणी क्रमांक झेडए-२, २२३० कामगार व सेवायोजन, (०१) (१३) महाराष्ट्र नाविण्यपूर्ण स्टार्टअप धोरण लेखाशिर्ष २२३० ए ३३४, ३१-सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशिर्षाखाली सन २०२३-२४ मध्ये मंजूर करण्यात आलेल्या तरतुदीमधून भागविण्यात यावा.

३. याकरिता आयुक्त, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता यांना नियंत्रण अधिकारी, सहायक संचालक, लेखा यांना "आहरण व संवितरण अधिकारी" तसेच मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य नाविन्यता सोसायटी यांना "नोडल एजन्सी" म्हणून प्राधिकृत करण्यात आले आहे.

४. सदर निधी आयुक्त, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता आयुक्तालय, नवी मुंबई यांनी महाराष्ट्र राज्य नाविन्यता सोसायटी यांचेकडे वर्ग करुन याबाबतचे लेखे स्वतंत्र व अद्ययावत ठेवावेत. उपरोक्त निधी ज्या कारणास्तव उपलब्ध करुन देण्यात आला आहे त्याच कारणास्तव खर्च करण्याची जबाबदारी मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य नाविन्यता सोसायटी यांची राहील.

तसेच प्रत्यक्ष खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र (Utilization Certificate) विहित कालमर्यादेत सादर करण्याची दक्षता घ्यावी. उक्त निधी खर्च करताना वित्त व नियोजन विभागाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचना/अटी व शर्तीचे पालन करावे.

५. सदर निधी वित्तीय नियमपुस्तीका १९७८ नियम क्र. २७ (२) नुसार सक्षम प्राधिकारी यांचे मान्यतेने व वित्त विभाग, परिपत्रक क्र.अर्थसं-२०२२/प्र.क्र.४०/अर्थ-३, दिनांक १२ एप्रिल, २०२३ मधील सूचनांनूसार वितरीत करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२३०७१२१५०४५८६९०३ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Manjusha Amit Karande
Date: 2023.07.12 15:07:41 +05'30'

**( मंजुषा कारंडे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. आयुक्त, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता आयुक्तालय, नवी मुंबई.

२. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य कौशल्य विकास सोसायटी, मुंबई.
३. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य नाविन्यता सोसायटी, मुंबई
४. महालेखापाल (लेखा परीक्षा /लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
५. जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा कोषागार कार्यालय, ठाणे.
६. अपर कोषागार अधिकारी, उप कोषागार कार्यालय, कोकण भवन, नवी मुंबई,
७. कार्यासन अधिकारी, (प्रशा-३), कौशल्य,रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. प्रधान सचिव, कौशल्य,रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे वरिष्ठ स्वीय सहायक.
९. निवड नस्ती (कौशल्य-२).